**प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी, औरंगाबाद यांच्या कार्यालयाच्या संदर्भात "नियंत्रक अधिकारी" आणि "आहरण व संवितरण अधिकारी " म्हणून अधिकाऱ्यांची घोषणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**

शासन निर्णय क्रमांकः- प्रविचौ-१२१०/प्र.क्र.१३/१०/११-अ

दिनांकः- २० मार्च,२०१०

वाचावेः- शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग,क्रमांकः- एसपीओ-२८०७/प्र.क्र.२१/०७/११-अ, दि.२८.१०.२००९

उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय दि.२८.१०.२००९ अन्वये प्रत्येक महसूली विभागस्तरावर प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकाऱ्यांची कार्यालये निर्माण करण्यात आली आहे. सदर प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकाऱ्यांच्या कार्यालयातील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व भत्ते काढण्यासाठी तसेच इतर कार्यालयीन खर्चाकरीता नियंत्रक अधिकारी तसेच आहरण संवितरण अधिकारी यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

सामान्य प्रशासन विभागा अंतर्गत प्रधान शीर्ष २०५२,गौण शीर्ष ०९२,उपशीर्ष(००)(०२) प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकाऱ्यांची कार्यालये (०२) (०४) औरंगाबाद विभाग (२०५२०३१२) या लेखाशीर्षाखाली प्रादेशिक चौकशी अधिकाऱ्यांच्या कार्यालयाकरिता वित्तीय तरतूद करण्यात आली आहे. सदर लेखा शीर्षाच्या संदर्भात "नियंत्रक अधिकारी "म्हणून" विभागीय आयुक्त, औरंगाबाद" या पदाच्या पदधारकास घोषित करण्यात येत आहे.

त्याच प्रमाणे उपरोक्त लेखाशीर्षाच्या संदर्भात प्रादेशिक चौकशी अधिकाऱ्यांच्या कार्यालयाकरिता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून उपायुक्त,सामान्य प्रशासन, विभागीय आयुक्त कार्यालय,औरंगाबाद या पदाच्या पदधारकास घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महसूल व वन विभागाच्या सहमत अनौपचारीक संदर्भ क्रमांक- ३८/ई-१, दि.६.३.२०१० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात आला असून महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला आहे. त्याचा संगणक संकेतांक क्रमांक - २०१००३२०१७५११०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**(चा.के.परांजपे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन,**

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र-१ ,मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र-२ , नागपूर.
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी ,मुंबई.
संचालक,लेखा व कोषागारे,मुंबई.
कार्यासन व्यय-४,अर्थसंकल्प-१४,अर्थसंकल्प-२, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
विभागीय आयुक्त तथा नियंत्रक अधिकारी, औरंगाबाद विभाग,औरंगाबाद.
उपायुक्त, सामान्य प्रशासन तथा आहरण व सवितरण अधिकारी,विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद.
श्री.बी.के.उसारे,प्रादेशिक विभागीय चौकशी अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय,औरंगाबाद.
सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन क्रमांक-२५, निवड नस्ती.